**महाराष्ट्र राज्य गुजराती साहित्य अकादमीच्या योजनांच्या नियमावलीतील वाङमय पुरस्कारामध्ये प्रकिर्ण (समीक्षा) या प्रकाराचा समावेश करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र. गुसाअ ७११८ / प्र.क्र.२१/सां.का.४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०२ नोव्हेंबर, २०१८

वाचा :- १) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र. गुसाअ २०१३/नियमावलीत/ प्र.क्र.१०५/सां.का.४, दिनांक १८ जून, २०१३
२) महाराष्ट्र राज्य गुजराती साहित्य अकादमी, मुंबई यांचे पत्र क्र. मरागुसाअ/२३९/ सां.का./२०१८, दिनांक २४ जानेवारी, २०१८

**प्रस्तावना :-**

गुजराती साहित्याच्या सर्वांगिण उन्नतीसाठी व उत्तेजनासाठी महाराष्ट्र राज्य गुजराती साहित्य अकादमी, मुंबई या कार्यालयाची दिनांक ३० ऑगस्ट, १९९६ रोजी स्थापना करण्यात आली आहे. सदर अकादमीमार्फत गुजराती भाषेच्या उन्नतीसाठी ज्या विविध योजना कार्यान्वित करण्यात आल्या आहेत, त्या योजनांच्या अंमलबजावणीसंदर्भात संदर्भाधीन क्र. १ येथील शासन निर्णयान्वये नियमावली तयार करण्यात आली आहे. या नियमावलीन्वये विविध विषयाबाबतचे ८ वाङमय पुरस्कार देण्यात येतात. या वाङमय पुरस्कारात प्रकिर्ण (समीक्षा) या पुरस्काराचा समावेश करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

संदर्भाधीन क्र. १ येथील शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्य गुजराती साहित्य अकादमीच्या निश्चित केलेल्या योजनांच्या नियमावलीतील वाङमय पुरस्कारात "प्रकिर्ण (समीक्षा)" या ९ व्या पुरस्काराचा खालीलप्रमाणे समावेश करण्यात येत आहे.

**पात्रता :-**

१. प्रत्येक वर्षाच्या १ जानेवारी ते ३१ डिसेंबर च्या दरम्यान प्रकाशित होणा-या मूळ साहित्य कृतींचा याअंतर्गत विचार करण्यात येईल.
२. या पुरस्कारअंतर्गत "प्रकीर्ण (समीक्षा)" या वाङमय प्रकाराचा विचार करण्यात येईल.
३. या पुरस्कारासाठी गुजराती साहित्यिकांच्या पुस्तकांची निवड करताना संबंधित साहित्यिकांचे महाराष्ट्रात किमान १५ वर्षे वास्तव्य असणे आवश्यक आहे.

**वित्तीय तरतूद :-**

| अ.क्र. | वाङमय पुरस्काराचा प्रकार | पुरस्काराची रक्कम रुपये |
|---|---|---|
| १ | प्रकीर्ण (समीक्षा) | प्रथम - १५,०००/- |
| | | द्वितीय - १०,०००/- |
| | **एकूण रुपये** | **२५,०००/-** |

तसेच, प्रकिर्ण (समीक्षा) या प्रकारांतर्गत वाङमय पुरस्काराचे अर्ज मागविणे, पुरस्कार प्रदान करणे इ. कार्यवाही शासन निर्णय क्र. गुसाअ २०१३/नियमावली/प्र.क्र.१०५/सां.का.४, दिनांक १८ जून, २०१३ मधील महाराष्ट्र राज्य गुजराती साहित्य अकादमीच्या नियमावलीमधील अ.क्र.७ नुसारच्या वेळापत्रकानुसार करण्यात येईल व पुरस्कार सोहळयाच्या वेळी पुरस्कार प्रदान करण्यात येईल.

२. महाराष्ट्र राज्य गुजराती साहित्य अकादमीच्या उपरोक्त पुरस्काराचा खर्च लेखाशिर्ष झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती, (१२) गुजराती अकादमी, (१२) (०२) गुजराती अकादमीची आस्थापना (कार्यक्रम), (२२०५ १७२१) ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली चालू आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिका-यास या संबंधीच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १४७/२०१८/ १४४३, दिनांक ६ सप्टेंबर, २०१८ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २५२/२०१८/व्यय-१५, दिनांक १ ऑक्टोबर, २०१८ अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१८११०२१६५९४९५०२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by Vilas Ramrao Thorat
Date: 2018.11.02 17:05:43 +05'30'

**( विलास रा. थोरात )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रति,**

१. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई,
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई, (२ प्रती)
३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
४. महालेखापाल-१ मुंबई (लेखा व अनुज्ञेयता १ / ले.प.) महाराष्ट्र राज्य,
५. अवर सचिव (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
६. निवड नस्ती, सां.का.४.